नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई यांना सन २०१४-१५ च्या खर्चावर आधारित सन २०१५-१६ साठी व २०१५-१६ च्या खर्चावर आधारीत सन २०१६-१७ साठी अनुदान वितरीत करण्याबाबत ....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अनुदान-२०१५/ प्र.क्र. ४०६/१५/राकावि-२,

गो.ते.रूग्णालय आवार, संकूल इमारत, १० वा मजला,
बी-विंग, मंत्रालय, मुंबई - ४००००१
दिनांक : ३१ मार्च, २०१७.

वाचा -

१) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०१६/ प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक - २० एप्रिल, २०१६.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन परिपत्रक क्र.अनुदान-२००९/प्र.क्र.४२ /आरोग्य-५, दिनांक :-१३ जानेवारी, २०१०.
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०१६/ प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक - ८ फेब्रुवारी, २०१७.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.१००/अर्थसंकल्प, दिनांक :-१५ फेब्रुवारी, २०१७.
५) सहायक संचालक (लेखा व लेखा परिक्षा) पुणे यांचे पत्र जा.क्र.ससंआसे/कक्ष-६४/ सहा.अनु/पुमा/माहिती/२०१७, दि. .०२.२०१७.
६) सहायक संचालक (लेखा व लेखा परिक्षा) पुणे यांचे पत्र जा.क्र.ससंआसे/कक्ष-६४/ सहा.अनु/उपलब्ध अनु/माहिती/२०१७, दि. २०.०३.२०१७.
७) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.अनुदान-२०१५/प्र.क्र.४०६/१५/राकावि-२, दिनांक :- १ डिसेंबर, २०१६.

प्रस्तावना -

या विभागाच्या वर उल्लेखीत शासन निर्णय दि.१३.०१.२०१० अन्वये नौरोसजी वाडीया मॅटर्निटी, परळ, मुंबई येथील रुग्णालयास शासनाकडून अनुदान मंजूर करण्याबाबत सुधारित धोरण निश्चित करण्यात आलेले असून त्यानुसार हॅास्पिटलच्या एकूण खर्चातील केवळ वेतन भत्ते व

औषधावरील खर्चासाठी संस्थेला अनुदान अनुज्ञेय असून हे अनुदान एकूण खर्चाच्या ८५% मर्यादेत (पैकी ५०% राज्यशासनाचा हिस्सा व उर्वरित ५०% बृहन्मुंबई महानगरपालिकेचा हिस्सा) मंजूर केले जाते. दि. १३.१.२०१० च्या शासन निर्णयानुसार परिगणना केल्याप्रमाणे नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस यांना सन २०१४-१५ च्या खर्चावर आधारित सन २०१५-१६ साठी व २०१५-१६ च्या खर्चावर सन २०१६-१७ या वर्षासाठी रुपये १५,३७,२१,६४४/- (रुपये पंधरा कोटी, सदोतीस लाख, एकवीस हजार, सहाशे चव्वेचाळीस फक्त) एवढे अनुदान संदर्भ क्रमांक ७ अन्वये मंजुर करण्यात आले आहे. तथापि सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात ( २२१० ०१७३) ३१ सहायक अनुदाने (वेत्तनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रु.६,००,००,०००/- इतके अनुदान मंजूर असून तरतुदीच्या ८०% च्या मर्यादेत निधी वितरीत करण्याबाबत वित्त विभागाने दि.२०.०४.२०१६ च्या परीपत्रकाद्वारे कळविले आहे. त्यामुळे नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई यांना अनुदानाचा पहिला हप्ता म्हणून रु.४,००,००,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी फक्त) वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. क्ष्वेतपरित्रकेतील अंतिम सुधारीत अंदाजानुसार लेखाशिर्ष २२१० ०१७३, ३१ - सहायक अनुदाने या लेखाशिर्षा खाली रक्कम रुपये १५,९०,२६,०००/- इतके अनुदान दर्शविण्यात आलेले आहे. सद्यस्थितीत वित्त विभागाने दिनांक ८ फेब्रुवारी, २०१७ च्या परिपत्रकाद्वारे मंजुर तरतूदीच्या ९० टक्केच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास कळविले आहे. त्यामुळे (२२१० ०१७३) ३१ सहायक अनुदाने (वेत्तनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रुपये १०,७१,२३,४००/- इतका निधी वितरणासाठी उपलब्ध असून त्यापैकी प्राईड इंडिया मार्फत चालविण्यात येणाऱ्या स्पर्श रुग्णालय सास्तुर, ता.लाहोर जि.उस्मानाबाद यांना देय असलेला रुपये ५३,०४,०००/- इतका निधी वजा जाता रुपये १०,१८,१९,४००/- इतके अनुदान वितरणासाठी शिल्लक आहे. सदर शिल्लक अनुदान नौरोसजी वाडिया मॅटर्निटी रुग्णालयाला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय -

वरील प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात (२२१० ०१७३) ३१सहायक अनुदाने (वेत्तनेत्तर) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेले रुपये १०,१८,१९,४००/- (अक्षरी रुपये दहा कोटी, अठरा लाख, एकोणीस हजार चारशे फक्त) इतके अनुदान नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल परळ, मुंबई यांना दुसरा हप्ता म्हणून वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर खर्च मागणी क्र. आर-१, २२१० -वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,०१-नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा, ११०- ( ०३) मुफसल रूग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदाने, (०३)(०१)- अध्यापनेतर रूग्णालये व दवाखाने, यांना सहाय्यक अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने, ( २२१० ०१७३) या तपशिलवार लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ साठी बी.डी.एस. वर उपलब्ध उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस अनुदान वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आलेले रू. १०,१८,१९,४००/- (अक्षरी रुपये दहा कोटी, अठरा लाख, एकोणीस हजार

चारशे फक्त) अनुदान अदा करण्यासाठी उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

ज्या-ज्या वेळी निरिक्षणासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना संस्थेचे हिशेब पाहिजे असतील त्या - त्यावेळी ते प्रस्तुत कागदपत्रांसहित संस्थेने सादर करावेत.

शासकीय अनुदान म्हणून मिळणाऱ्या रकमेचे हिशेब संस्थेने त्यांच्या नेहमीच्या इतर कार्यक्रमातून वेगळे ठेवणे आवश्यक आहे.

मंजूर नसलेल्या बाबींवरील खर्चाचा समावेश अनुदानात करण्यात आल्याचे आढळून आल्यास त्या खर्चाची एक रकमी वसुली करण्याचा अधिकार शासनास राहील. त्याकरिता वेळेचे बंधन असणार नाही.

हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयानुसार वित्तीय अधिकार नियमामध्ये करण्यात आलेल्या सुधारणाप्रमाणे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ चा भाग पहिला, उपविभाग-एक अनुक्रमांक २७ मधील नियम क्र.१४९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११८१२४३५११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7256abb8dd472637941e581488fb02eda9e0d6b701c434bcf471a0d525f80681, cn=Sanjay R More
Date: 2017.03.31 18:35:15 +05'30'

**सं.रा.मोरे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), पुणे-१.
३. उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
४. सहाय्यक संचालक, (लेखा व सेवा परिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-१/२, मुंबई.
६. जिल्हा कोषाधिकारी, ठाणे/ पुणे.
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सहसचिव ( अर्थसंकल्प / राकावि ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई-१.
९. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई-१.
१०.सचिव, नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई.
११.निवड नस्ती (राकावि-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-१.

*****